सन २०२५ करीता फेरपडताळणी व मुद्रांकनाच्या कामासाठी मुद्रांकन साहित्य खरेदीसाठीच्या खर्चास प्रशासकीय आणि वित्तीय मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा-२०२५/प्र.क्र.१८/ग्रा.सं.३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १२ फेब्रुवारी, २०२५

**वाचा -** नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.मुद्रांसा (७७)-१०२४/प्र.क्र.१/वैमाशा-५/१५, दिनांक-०९/१२/२०२४

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भीय पत्रान्वये वैध मापन शास्त्र यंत्रणेतील निरीक्षक, वैध मापन शास्त्र यांना दैनंदिन फेरपडताळणी व मुद्रांकन कामासाठी मुद्रांकन साहित्याची आवश्यकता असून सदर साहित्य भारत सरकार टांकसाळ, मुंबई यांचेकडून खरेदी करीता रू. ७३,५०,१४३/- इतका निधी उपलब्ध करून देण्याबाबत नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी उपरोक्त पत्रान्वये विनंती केली आहे. त्यानुषंगाने वैध मापन शास्त्र यंत्रणेसाठी सन २०२५ करीता मुद्रांक साहित्य खरेदी करण्यासाठी रू. ७३,५०,१४३/-इतक्या खर्चास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

सन २०२५ या वर्षाकरीता वैध मापन शास्त्र यंत्रणेतील निरीक्षकांना दैनंदिन फेरपडताळणी व मुद्रांकन कामासाठी आवश्यक असलेले मुद्रांक साहित्य भारत सरकार टांकसाळ, मुंबई यांच्याकडून खरेदी करण्याकरीता खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे **रूपये ७३,५०,१४३/-(रूपये त्र्याहत्तर लाख पन्नास हजार एकशे त्रैचाळीस मात्र)**एवढ्या खर्चास प्रशासकीय आणि वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | साहित्य | नग | दर रू. | एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | वर्ष २०२५ चे मुद्रांक ठसे संच | २७१ | १८,९६०/- | ५१,३८,१६०.०० |
| २ | वर्ष २०२५ चे मुद्रांक डाय संच | २७१ | ४,०२५/- | १०,९०,७७५.०० |
| ३ | एकूण किंमत (१+२) | | | ६२,२८,९३५.०० |
| ४ | राज्य वस्तु व सेवा कर ९ %प्रमाणे | | | ५,६०,६०४.०० |
| ५ | केंद्रीय वस्तु व सेवा कर ९ %प्रमाणे | | | ५,६०,६०४.०० |
| | **एकूण देय रक्कम (३+४+५)** | | | **रू.७३,५०,१४३.००** |

२. सदर खर्च मागणी क्र.एम-३, मुख्य लेखाशिर्ष ३४७५- इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा, १०६- वजने व मापे यांचे विनियमन, (००) (०१) वजने व मापे विनियमन- (अनिवार्य) (३४७५-००९३), ५२- यंत्रसामग्री व साधनसामग्री या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३, विनियम-भाग-२, दिनांक १७ एप्रिल २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम,१९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारामधील अ.क्र.४ वरील नियम क्र.७ अनुसार प्रशासकीय विभागास दिलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०२१२१८१८४०३१०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2025.02.12 18:19:34 +05'30'

**( पूजा मानकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
३) महालेखापाल-१, (लेखा व परीक्षा), मुंबई
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांना आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.
७) वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती, (ग्रा.सं.-३).